# देगास

## आणि छोटी नर्तकी

लेखक:
लॉरेन्स
ॲनहोल्ट

## परिचय

तुम्ही कधी एका प्रसिद्ध कला संग्रहालयातील एका विशिष्ट खोलीत गेलात, तर तिथे तुम्हाला एका छोट्या नर्तकीचे सुंदर कांस्य शिल्प दिसेल. ती एक पाय पुढे करून उभी आहे, तिचे हात पाठीमागे एकमेकांत गुंफले आहेत – तिच्या चेहऱ्यावरचे भाव थकलेले आणि काहीसे उदास आहेत.

तुम्ही संग्रहालयाच्या गाईडशी गप्पा मारल्यात, तर तो तुम्हाला त्या छोट्या बॅले नर्तकीची गोष्ट सांगतो.

“तिचं नाव मेरी आहे,” गाईड म्हणतो. “मी मेरीला रोज बघतो. दरवेळी मला वाटतं की मी तिला चांगलं ओळखतो....”

मग तुम्ही त्या बॅले नर्तकीचे शिल्प बारकाईने न्याहाळू लागता. तेव्हा गाईड पुन्हा सांगतो: “बघा या छोट्या मेरीकडे. मी खात्रीने सांगतो, तुम्ही तिच्याकडे खूप वेळ टक लावून पाहिलंत, तर ती हालचाल करतेय असंच वाटेल तुम्हाला!”

या पुस्तकात तुम्हाला मेरी या बॅले नर्तकीची गोष्ट वाचायला मिळेल. ही गोष्ट फार फार वर्षांपूर्वीच्या पॅरिसमध्ये घडते. ही गोष्ट मेरीची तर आहेच, पण एका अतिशय प्रसिद्ध कलाकाराची, एडगर देगासचीही आहे.

# देगास आणि छोटी नर्तकी

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

एका प्रसिद्ध कला संग्रहालयात, एका मोठ्या खोलीच्या मध्यभागी, एका छोट्या नर्तकीचे सुंदर शिल्प आहे. ती एक पाय पुढे करून उभी आहे. तिचे हात पाठीमागे एकमेकांत गुंफलेले आहेत. ती थकलेली आणि थोडी उदास दिसत आहे.

हे शिल्प *एडगर देगास* नावाच्या शिल्पकाराने एका शतकापेक्षाही जास्त वर्षांपूर्वी बनवले होते.

संग्रहालयातील कलाकृतींची माहिती देणाऱ्या गाईडकडे छोट्या *बॅले* नर्तकीच्या आयुष्याची कहाणी आहे. बाहेर पाऊस पडत असतो आणि लोकांना संग्रहालयात रेंगाळण्याशिवाय दुसरा पर्याय नसतो, तेव्हा कुणीतरी गाईडला विचारतोच की ती कोण होती.

“तिचं नाव *मेरी* आहे,” गाईड म्हणतो. “मी मेरीला रोज बघतो. दरवेळी मला वाटतं की मी तिला चांगलं ओळखतो....”

....मेरी आणि तिचे आईवडील खूप गरीब होते, पण मेरीचं केवळ एकच स्वप्न होतं – तिला नर्तकी बनायचं होतं. कुणी साधीसुधी नर्तकी नाही: तिला पॅरिसच्या ऑपेरा हाऊसमध्ये नृत्य करायचं होतं. तिला जगातली सर्वात प्रसिद्ध बॅले नर्तकी बनायचं होतं.

मेरीचे वडील टेलर होते आणि तिची आई कपडे धुण्याचं काम करायची. खूप कष्ट करून त्यांनी पैसा साठवला. मग मेरीने मोठ्या बॅले शाळेच्या प्रवेश परीक्षेची तयारी केली.

तिच्या वडिलांनी परीक्षेसाठी तिला एक खास झगा शिवला. तिच्या आईने तिला शुभेच्छा दिल्या आणि तिच्या केसांत एक लाल-पिवळसर रंगाची लांबसडक रिबीन बांधली.

परीक्षेत मेरीने यापूर्वी कधी केलं नाही इतकं सुंदर नृत्य करून दाखवलं. तिथल्या वृद्ध शिक्षकांना तिचं नृत्य आवडलं.

“आम्ही तुला प्रवेश देऊ,” ते म्हणाले, “पण तुला कठोर मेहनत करावी लागेल.”

“करेन,” मेरी म्हणाली, “मला जगातली सर्वात प्रसिद्ध नर्तकी व्हायचंय.”

सगळे हसू लागले. “ते पाहू आपण!” वृद्ध शिक्षक म्हणाले.

तो मेरीच्या आयुष्यातला सर्वात रोमांचक दिवस होता. आपल्या कुटुंबियांना ही बातमी द्यायला ती अधीर झाली; पण घरी जाणार इतक्यात, असं काही घडलं ज्याने तिच्या आनंदावर विरजण पडलं.

मोठ्या खोलीच्या पाठीमागे कुणीतरी ओरडू लागलं. डोळ्यांत अश्रू आलेली एक मुलगी मेरीच्या शेजारून मागे धावत गेली. तिच्या मागे महागडे कपडे घातलेला, उग्र दिसणारा, पांढऱ्या दाढीचा एक माणूस धावत गेला.

"तू एका जागी स्थिर का बसत नाहीस?" तो माणूस ओरडला. "इतकी हालचाल केलीस तर मी तुझं चित्र कसं काढायचं?"

मेरी घाबरली.

"कोण आहे हा तापट माणूस?" ती शेजारी उभ्या असलेल्या मुलीकडे कुजबुजली.

"तू नवीन विद्यार्थिनी आहेस ना, कळेल लवकरच तुला. तो *देगास* आहे, घोड्यांचा आणि नर्तकींचा चित्रकार. तो सगळ्यांशी असाच वागतो."

संग्रहालयात, छोट्या बॅले नर्तकीच्या शिल्पाभोवती मोठी गर्दी गोळा झाली.

"बघा जरा तिच्याकडे," गाईड म्हणाला. "बघा या छोट्या मेरीकडे. मी खात्रीने सांगतो, तुम्ही तिच्याकडे खूप वेळ टक लावून पाहिलंत, तर ती हालचाल करतेय असंच वाटेल तुम्हाला!"

"मग तिला बॅले शाळेत प्रवेश मिळाला का?" कुणीतरी विचारले.

"हो तर!" गाईड म्हणाला, "तिला प्रवेश मिळाला. तिने कठोर मेहनत केली, खूप सराव केला. खरंतर, ती एवढी तरबेज झाली की वृद्ध शिक्षकांनी तिला ख्रिसमसला ऑपेरा हाऊसच्या बॅलेत एक प्रमुख भूमिका द्यायचा विचार केला...."

....मेरीचं स्वप्न प्रत्यक्षात उतरू लागलं.

आता म्हातारा देगास तिला पूर्वीसारखा भयंकर वाटत नव्हता. दररोज, तो आपली उंच टोपी आणि चित्रकलेची वही घेऊन सगळ्यांवर आगपाखड करायचा, त्यांना शिव्याशाप द्यायचा. तो मोठ्या त्वेषाने काम करायचा आणि रंगीत खडू घेऊन मुलींची, शिक्षकांची आणि संगीतकारांची चित्रं काढायचा.

“स्थिर राहा!” तो ओरडतच बोलायचा. “असं नाही. असं राहा....!” मग तो एखाद्या नवख्या नर्तकीला कसं उभं राहायचं, बसायचं याची तंत्र दाखवायचा.

एवढे सुंदर कपडे घातलेल्या चित्रकाराला एका पायावर संतुलन साधताना बघून मेरीला हसू आवरायचं नाही.

एकदा मेरीने देगासच्या चित्रांची झलक पाहिली आणि ती चकीत झाली. ती चित्रं विविध रंगांनी चमकत होती. देगासने सगळ्या विद्यार्थिनींची चित्रं काढली होती, पण त्या बॅले तारकांसारख्या दिसत नव्हत्या. मुलींच्या विचित्र मुद्रा देगासने चित्रांमध्ये दाखवल्या होत्या,

उदाहरणार्थ....

बडबड करताना

आळस देताना,

सँडल घालताना,

वृत्तपत्र वाचताना,

कपडे ठीकठाक करताना.

मेरीला नृत्य खूप आवडायचं. ती शाळेत सकाळी सगळ्यांच्या आधी यायची आणि रात्री सगळ्यांच्या शेवटी घरी जायची.

मग, एके दिवशी, सगळं काही विपरीत घडू लागलं.

मेरीचे वडील आजारी पडले. काही काळाने ते काम करायला असमर्थ झाले. तिची आई कपडे धुण्याची जास्त कामं घेऊ लागली, पण त्यांच्याकडे मेरीची फी देण्याइतपत पैसे नव्हते.

एक प्रसिद्ध नर्तकी बनायचं मेरीचं स्वप्न धूसर होऊ लागलं.

“तुला मदत करायला मला आवडेल, मेरी,” दयाळू वृद्ध शिक्षक म्हणाले, “पण तू दररोज शिकायला आली नाहीस तर मला ख्रिसमस बॅलेची प्रमुख भूमिका दुसऱ्या कुणालातरी द्यावी लागेल. कदाचित मग तुझ्यासाठी आपल्याला थिएटरची फरशी झाडण्यासारखी दुसरी छोटी कामं शोधावी लागतील.”

एका कर्कश आवाजाने त्यांच्या संवादात व्यत्यय आणला.

“तू माझ्या चित्रासाठी बस. मी तुला त्याचे पैसे देईन. पण तुला खूप मेहनत करावी लागेल आणि बडबड बंद करावी लागेल. समजलं?”

इतर मुली हसत-खिदळत, बडबड करत कार्यक्रमासाठी तयार होऊ लागल्या. देगाससोबत मेरी एकटीच उरली. त्या तापट कलाकारने मेरीला पाठीमागे हात बांधून छताकडे बघत राहायला सांगितलं. सगळ्या नर्तकींना अशा पद्धतीने उभं राहायची सवय झाली होती. पण देगासने खूप वेळ काम सुरू ठेवल्यामुळे मेरीची मान दुखू लागली.

मग रोज दुपारी देगास मेरीचं चित्र काढू लागला. त्याने मेरीला एकाच जागी इतका वेळ स्थिर उभं ठेवायचा की तिला रडावसं वाटायचं, पण तिला कधी तक्रार करायची हिंमत झाली नाही.

मेरीला पुरेसे पैसे मिळत नव्हते. सगळे पैसे तिच्या वडिलांच्या डॉक्टरांच्या फीसाठीच खर्च होत. तिच्या नृत्याच्या वर्गाची फी देण्यासाठी पैसे उरत नसत. ख्रिसमस बॅलेची तारीख जवळ आली तसं तिला कळून चुकलं की तिला आता प्रसिद्ध होण्याची संधी कधीच मिळणार नाही.

जेव्हा ती रात्र उजाडली, तेव्हा गरीब मेरीला तो कार्यक्रम बघायचीसुद्धा परवानगी मिळाली नाही, कारण देगासला रात्री उशीरापर्यंत काम करायचं होतं.

खूप उशीर होऊ लागला.

"माफ करा, देगास सर," मेरी पुटपुटली.

"मला लवकर घरी जायला हवं. उशीर झाला तर घरचे लोक काळजीत पडतील. माझे बाबासुद्धा आजारी आहेत."

"घरचे लोक!" देगास खेकसला. "काळजीत पडतील? तुला माहितीय, माझी काळजी कोण करतं? कुणीच नाही, माझ्याकडे फक्त माझं काम आहे आणि आता माझ्या डोळ्यांची दृष्टीसुद्धा मला सोडून चाललीय."

"माफ करा, सर, माझ्या लक्षात नाही आलं."

देगास काहीवेळ शांतपणे काम करत राहिला. त्याने थोडी माती घेतली आणि त्वेषात येऊन त्याच्या लांबसडक बोटांनी काम करू लागला. मेरीने त्याच्या डोळ्यांत अश्रू पाहिले.

"नाही," तो मृदूपणे म्हणाला, "तुझ्या कसं लक्षात येईल? एक सांग मला, मेरी, एका चित्रकाराला कोणती गोष्ट सर्वात मौल्यवान असते?"

"डोळे, सर?"

"अगदी बरोबर, माझे डोळे मला नर्तकीच्या पायांसारखेच आहेत, आलं लक्षात? माझे डोळे आजारी पडलेयत, मेरी. मी काय करतोय हे मला नीटसं दिसत नाही. म्हणून तर मी मातीसोबत काम करतोय."

यामुळेच तर देगाससर सारखे रागात असतात का? अचानक मेरीच्या मनात तापट देगासबद्दल सहानुभूती दाटून आली.

"मला खूप वाईट वाटतंय," ती म्हणाली.

त्यावर देगासने असं काही केलं जे मेरीने यापूर्वी त्याला कधीच करताना बघितलं नव्हतं. त्याने मेरीकडे बघितलं आणि स्मित केलं.

"मलाही वाईट वाटतंय, मेरी," तो म्हणाला. "पण हे शिल्प बघ. हे माझं आजवरचं सर्वोत्कृष्ट काम आहे. आभारी आहे, माझी छोटी नर्तकी. आता तुला घरी जायलाच हवं."

मेरी खाली उतरली. तिचे पाय कमजोर झाले होते. तिने आपल्या केसांतली लाल-पिवळसर रंगाची रिबीन काढून वृद्ध देगासला दिली. मग आपले नर्तकीचे कपडे उतरवले उतरवून ती घाईघाईत आपल्या घरी गेली.

ख्रिसमस बॅलेच्या कार्यक्रमात, पडदा पडल्यावर, थिएटरमधल्या गर्दीने टाळ्या वाजवून जयघोष केला. बाहेर, रस्त्यावर एका मंद दिव्याखाली, एक वृद्ध, अधू दृष्टीचा कलाकार अडखळत, ठेचकाळत घरी जाण्यासाठी संघर्ष करत होता.

त्याने आपल्या हातात लाल-पिवळसर रंगाची रिबीन घट्ट पकडून ठेवली होती.

“म्हणजे तिचं स्वप्न कधीच प्रत्यक्षात उतरलं नाही का?” कुणीतरी विचारले.

“थांबा,” गाईड म्हणाला. “गोष्ट अजून संपली नाहीये....”

दोन वर्षांनी, मेरी आपल्या आईला कपडे धुण्यात मदत करत होती, तेव्हा पोस्टाने एक पत्र आलं.

“तुझं पत्र आहे, मेरी,” तिची आई म्हणाली.

मेरीने पत्र फोडलं. आत एक तिकीट आणि एका मोठ्या कला प्रदर्शनाचं निमंत्रण होतं. निमंत्रण कार्डावर कुणीतरी लिहिलं होतं: “छोटी नर्तकी, मेरीसाठी.”

मेरी आणि तिची आई प्रदर्शनाला गेल्या. इमारतीत खूप गर्दी होती. भिंतींवर सुंदर चित्रं टांगली होती. पण सर्वात जास्त गर्दी एका मोठ्या काचेच्या पेटीभोवती जमली होती.

मेरी त्या गर्दीतून काचेच्या पेटीनजिक पोहोचली.

“हे काय!” ती चकीत झाली. “ही तर मी आहे!”

देगासने त्या शिल्पाला खरे कपडे चढवले होते. कुणीही इतकी उत्कृष्ट कलाकृती यापूर्वी कधी बघितली नव्हती. तिच्या केसांत लाल-पिवळसर रंगाची रिबीन होती.

संग्रहालयातील शेवटची व्यक्ती निघून गेली तेव्हा गाईडने नर्तकीच्या सँडलवरील धूळ पुसली.

“शुभरात्री, मेरी,” तो म्हणाला आणि शिट्टी वाजवत निघून गेला. कुलपातून किल्ली फिरली तसे छोट्या नर्तकीने स्मित केल्यासारखे वाटले. संग्रहालयाच्या छतावर पडणारा पाऊस जगातील सर्वात प्रसिद्ध नर्तकी मेरीसाठी टाळ्यांचा कडकडाट करत आहे, असे वाटू लागले.

मेरीला जगातील सर्वात प्रसिद्ध बॅलेरिना नर्तकी बनायचे होते. पण तिच्याकडे फी देण्यासाठी पैसे नव्हते. म्हणून ती कलाकार एडगर देगाससाठी बॅले शाळेत मॉडेलिंग करू लागली.

देगासच्या छोटी नर्तकीच्या शिल्पाने आकार घेतला तसे मेरीला त्या तापट कलाकाराविषयी सहानुभूती वाटू लागली. शिल्प पूर्ण झाले आणि शेवटी ती सर्वात प्रसिद्ध नर्तकी बनली.

एका महान कलाकाराच्या आयुष्याची उत्कृष्ट ओळख, आकर्षक चित्रांसोबत.